**अंगणवाडी केंद्र इमारतीमध्ये शौचालयाचे बांधकाम करणे व पिण्याच्या पाण्याची सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी अर्थसंकल्पित केलेला निधी खर्च करण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. एबावि-२०२०/प्र.क्र.१८०/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २० डिसेंबर, २०२१

वाचा (१) महिला व बाल विकास विभाग,शा.नि. क्र.एबावि-२०१७/प्र.क्र.३४८/का.६, दिनांक ३०.०६.२०१८.
(२) महिला व बाल विकास विभाग,शा.नि. क्र.एबावि-२०१८/प्र.क्र.४०८/का.६, दिनांक ०५.१२.२०१८.
(३) केंद्र शासनाचे पत्र क्र.CD-II-१४/७/२०१७-CD-II, दिनांक १२ .११.२०२१.
(४) वित्त विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र. क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१.

**शासन निर्णय:-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत कार्यरत स्वत:च्या मालकीच्या अंगणवाडी केंद्र इमारतीमध्ये केंद्र शासनाने निर्धारित केल्याप्रमाणे शौचालयाचे बांधकाम करणे करीता प्रति अंगणवाडी केंद्र रु.१२,०००/- व पिण्याच्या पाण्याची सुविधा उपलब्ध करुन देण्याकरीता प्रति अंगणवाडी केंद्र रु.१०,०००/- याप्रमाणे सुधारित दर लागू करण्यास वाचा क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली आहे. तसेच याबाबत मार्गदर्शक सूचना संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या आहेत.

२. त्यानुषंगाने केंद्र शासनाने अंगणवाड्यांमध्ये शौचालय बांधकाम करणे व पिण्याच्या पाण्याची सुविधा उपलब्ध करून देण्याकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध करून दिलेल्या निधीच्या मर्यादेत खालीलप्रमाणे तक्त्यातील रकाना क्र. १ व २ मधील लेखाशीर्ष / उद्दिष्टांकरिता रकाना क्र.३ मधील अर्थसंकल्पित तरतुदीमधून रकाना क्र.४ नुसार रुपये २.७५ कोटी इतका निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना वितरीत व खर्च करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| लेखाशीर्ष | उद्दिष्ट | अर्थसंकल्पित तरतूद २०२१-२२ | प्रस्तावित वितरण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| २२३६-पोषण आहार<br>०२-पोषक अन्न व पेये यांचे वितरण<br>१०१-विशेष पोषण आहार कार्यक्रम<br>(१०)- अंगणवाडीमध्ये सोयी सुविधा पुरविणे<br>(१०) (०१ )अंगणवाडीमध्ये पिण्याच्या पाण्याची सुविधा पुरविणे.<br>(केंद्र हिस्सा ६०% ) (कार्यक्रम)<br>(२२३६ २०२१) | २७- लहान बांधकामे | १५०.०० | ७५.०० |
| | ५०- इतर खर्च | १५.०० | ०७.५० |
| | एकूण | १६५.०० | ८२.५० |

| लेखाशीर्ष | उद्दिष्ट | अर्थसंकल्पित तरतूद २०२१-२२ | प्रस्तावित वितरण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| (१०)(०२ )अंगणवाडीमध्ये पिण्याच्या पाण्याची सुविधा पुरविणे. (राज्य हिस्सा ४०% )(कार्यक्रम) (२२३६ २०३९) | २७- लहान बांधकामे | १००.०० | ५०.०० |
| | ५०- इतर खर्च | १०.०० | ०५.०० |
| | एकूण | ११०.०० | ५५.०० |
| | **एकूण (अ)** | **२७५.००** | **१३७.५०** |
| (१०)(०३ )अंगणवाडीमध्ये शौचालयाचे बांधकाम करणे ( केंद्र हिस्सा ६०% )(कार्यक्रम) (२२३६ २०४८) | २७- लहान बांधकामे | १५०.०० | ७५.०० |
| | ५०- इतर खर्च | १५.०० | ०७.५० |
| | एकूण | १६५.०० | ८२.५० |
| (१०)(०४ )अंगणवाडीमध्ये शौचालयाचे बांधकाम करणे ( राज्य हिस्सा ४०% )(कार्यक्रम) (२२३६ २०५७) | २७- लहान बांधकामे | १००.०० | ५०.०० |
| | ५०- इतर खर्च | १०.०० | ०५.०० |
| | एकूण | ११०.०० | ५५.०० |
| | **एकूण (ब)** | **२७५.००** | **१३७.५०** |
| **एकूण (अ)+(ब)** | | **५५०.००** | **२७५.००** |

३. सदर शासन निर्णय संदर्भाधीन क्र. ४ येथील वित्त विभागाच्या दिनांक १४.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णयातील अटी व शर्तीचे तंतोतंत पालन करण्याची जबाबदारी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांची राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२२०१२३८२३४१३० आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, pseudonym=58C42BF9F3ABBB1C15CFBC42D0AA8503E42564DB, serialNumber=7EBBBC3712E8D459EF90BF7AAE4EA46E9CAEBDD50CFECDE2EE7CE0454FA0416A, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2021.12.21 15:40:34 +05'30'

**(महेश वरूडकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),(लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
३) मा. मंत्री (म. व बा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
५) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी(महिला व बाल विकास),जिल्हा परिषद
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
८) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का.१४७२) / वित्त विभाग (व्यय-६/ अर्थ-७), मंत्रालय, मुंबई
९) कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवड नस्ती -का-६.